औरंगाबाद विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांच्या महाराष्ट्र विकास सेवा गट-ब मध्ये तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्त्या देणे.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन आदेश क्र.: मविसे-१०/२०१४/प्र.क्र.६७/आस्था-३अ,

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : ३० आक्टोबर,२०१४.

**संदर्भ:-** शासन आदेश, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, क्र.: मविसे-१०/२०१४/प्र.क्र.६७/आस्था-३अ, दि.२२ मे २०१४.

**आदेश :-**

उपरोक्त संदर्भाधीन आदेशान्वये औरंगाबाद विभागातील जिल्हा तांत्रिक सेवा व जिल्हा सेवा वर्ग-३ मधील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र विकास सेवा गट-ब या संवर्गात पीबी-२ वेतनश्रेणी रुपये ९३००-३४८००+४४०० ग्रेडवेतन या वेतनश्रेणीत तात्पुरत्या स्वरुपात निवडीने नियुक्ती (तदर्थ पदोन्नतीने) देण्यात आली आहे .सदर पदोन्नती प्रस्तावातील पंचायत संवर्गातील,श्री. एस.जी. वांगीकर आणि श्री.एस.एल.तेलतुंबडे या कर्मचाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी/लाचलुचपत प्रकरण/न्यायालयीन प्रकरण सुरु असल्याने सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दिनांक २.४.१९७६ मधील तरतूदीनुसार विभागाने सदर कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यात येऊ नये असा जाणिवपूर्वक निर्णय शासन मान्यतेने घेतला आहे. श्री.वांगीकर आणि श्री.तेलतुंबडे या कर्मचाऱ्यांऐवजी पंचायत संवर्गातील पुढील सेवाज्येष्ठ कर्मचारी श्री.व्ही.एम.नागरगोजे आणि श्री.ए.बी.गुंजकर यांना निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्यांच्या कालावधीसाठी उक्त कर्मचाऱ्यांच्या विभागीय चौकशी/लाचलुचपत प्रकरणे/न्यायालयीन प्रकरणांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत तदर्थ पदोन्नती देण्यांत येत आहे. सदर नियुक्तीनंतर त्यांची नेमणूक पुढीलप्रमाणे करण्यात येत आहे सूचीचा मजकूर लिहा.

| अ.क्र | नाव | सध्याचे पद | निवडीने नियुक्तीनंतरचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १. | श्री.व्ही.एम.नागरगोजे | विस्तार अधिकारी (पंचायत) जि.प.बीड | सहा.गट विकास अधिकारी, पंचायत समिती, गंगाखेड जिल्हा परभणी | रिक्त पदी |
| २. | श्री.ए.बी.गुंजकर | विस्तार अधिकारी (पंचायत) जि.प.जालना | सहा.गट विकास अधिकारी, पंचायत समिती, माजलगांव जिल्हा बीड | रिक्त पदी |

२. वरील कर्मचा-यांना सरळसेवेच्या कोट्यावर तात्पुरत्या स्वरुपात, तदर्थ पदोन्नतीने देण्यात आलेली नियुक्ती ही खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) सदर तदर्थ पदोन्नती ११ महिने अथवा विभागीय चौकशी/लाचलुचपत प्रकरणे/न्यायालयीन प्रकरणांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन अथवा आयोग पुरस्कृत उमेदवार उपलब्ध होतील यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत राहिल. दरम्यानच्या काळात आयोग पुरस्कृत उमेदवार प्राप्त झाल्यास, तदर्थ पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना पदावनत करण्यांत येईल. सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबधित अधिका-याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

ब) सदर तदर्थ पदोन्नती सरळसेवेच्या कोटयातील पदावर देण्यात येत असल्याने ती तात्पुरत्या स्वरुपाची असून, महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

क) सदर तदर्थ पदोन्नती ही संबंधित अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र विकास सेवा विभागीय परीक्षा नियम, १९९१ व सुधारणा नियम, १९९८ मधील तरतूदीनुसार विहित मुदतीत परीक्षा उत्तीर्ण होण्याच्या अधीन राहून देण्यात येत आहे. अन्यथा ते पदावनतीस पात्र ठरतील.

ड) सदर तदर्थ पदोन्नती शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही-१०८७/२००/प्र.क्र.३/८७/१२, दिनांक ८.१०.१९९० मधील तरतूदीच्या अधीन राहील.

इ) सदर तदर्थ पदोन्नती ही जे अधिकारी ज्येष्ठ आहेत, परंतु ज्यांची प्रकरणे विचारार्थ खुली ठेवण्यात आली आहेत, अशा अधिकाऱ्यांच्या ज्येष्ठतेस बाधा न आणता देण्यात येत आहे.

ई) सदर तदर्थ पदोन्नती ही मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्र. ८४५२ /२००४ मध्ये होणाऱ्या निर्णयाच्या अंतिम निकालाच्या अधीन राहील.

३. निवडीने नियुक्त झालेल्या पदोन्नत कर्मचा-यांनी, त्यांच्या नियुक्तीचे आदेश प्राप्त झाल्यापासून सात दिवसाच्या आत हजर होणे आवश्यक आहे. त्याप्रमाणे ते विहीत मुदतीत नियुक्तीच्या ठिकाणी हजर झाले नाहीत, तर त्यांना नियुक्ती नको असे समजून, शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग , क्रमांक: एसआरव्ही १०८७/११३१/ प्र.क्र.११ /८९ / १२, दिनांक ३०.४.१९९१ मधील तरतुदीनुसार त्यांच्या केलेल्या निवडीने नियुक्त्या रद्द करण्यात येतील.

४. संबंधित विभागीय आयुक्त /मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी निवडीने नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांना स्थानिक पर्यायी व्यवस्था करुन, तात्काळ कार्यमुक्त करावे आणि नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ हजर होण्याबाबत संबंधितांना सूचना दयाव्यात. तसेच संबंधित कर्मचाऱ्यांनी पदभार स्वीकारल्यानंतर त्याचा अहवाल शासनास सादर करावा.

५. निवडीने नियुक्त्या दिलेल्या पदोन्नत कर्मचाऱ्यांनी त्यांच्या नविन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे त्यांनी अनधिकृतरित्या रजेवर जाऊ नये. यासंदर्भात त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभाग परिपत्रक क्रमांक सीडीआर १०८२/२५६७/२८ /११, दिनांक ३०.८.१९८२ अन्वये दिलेल्या सूचनांकडे वेधण्यात येत आहे. तसेच नियुक्ती रद्द करणेसाठी कुठल्याही स्वरुपाचे आवेदन करु नये. तसे केल्यास सदर कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाई पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०३०१०५४१३१४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHINDE VIJAY DATTATRAYA

Digitally signed by SHINDE VIJAY DATTATRAYA
DN: CN = SHINDE VIJAY DATTATRAYA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 917064
Reason: I am approving this document
Date: 2014.10.30 13:07:59 +05'30'

**(वि.द.शिंदे)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल-२ ( लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
२. प्रधान सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने )
४. विभागीय आयुक्त, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, जालना, परभणी, बीड,
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, जालना, परभणी, बीड,
७. प्रधान सचिव ( ग्राम विकास व पंचायत राज ) यांचे स्वीय सहायक
८. संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जालना, बीड)
९. कार्यासन क्र. आस्था-२ / आस्था-३ /योजना -५ / ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१०. निवड नस्ती, का.क्र. आस्था-३अ, ग्राम विकास व जलसंधारण विभाग